३४५४-गणना, सर्वेक्षण व सांख्यिकी या लेखाशीर्षाखाली (०१) (०२) मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम (योजनांतर्गत योजना) याकरिता उपशीर्ष सुरू करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**

शासन निर्णय क्र.:- संकीर्ण-१०१५/प्र.क्र.१३२/का.१४१५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख:- ०९ नोव्हेंबर,२०१५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील तरूणांनी राज्यातील विकास प्रक्रिया व त्यातील टप्पे जाणून घ्यावेत व ते समजून घेत असताना शासकीय यंत्रणेतील कामकाज, त्यातील घटकांचा ताळमेळ आणि निर्णयप्रक्रियेचा अनुभव तरूणांनी मिळवावा, त्यातून समर्पित वृत्तीने समाजसेवा करण्यासाठी प्रामाणिक, ध्येयवादी, सुजाण नागरिक तयार व्हावेत यासाठी राज्यातील तरूणांसाठी मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम सुरू करण्यात येणार आहे. सदर मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रमाची अंमलबजावणी करणे, त्याचे संनियंत्रण व मूल्यमापन करण्याची जबाबदारी अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या कार्यालयावर सोपविण्यात आली आहे. सदर कार्यक्रम राबविण्याकरिता येणारा अपेक्षित खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्पात तरतूद करण्याकरिता नवीन उपशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन ३४५४- जनगणना, सर्वेक्षण व सांख्यिकी या मुख्य लेखाशीर्षाखाली खालीलप्रमाणे नवीन उपशीर्ष सुरू करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मागणी क्र. ओ-९ | Demand No. O-9 |
| ३४५४ जनगणना सर्वेक्षण व सांख्यिकी | 3454 Census Survey and Statistics |
| ०२ सर्वेक्षण व सांख्यिकी | 02 Survey and Statistics |
| ११२ आर्थिक सल्ला व सांख्यिकी | 112 Economic Advice and Statistics |
| (०१) अर्थ व सांख्यिकी संचालनालय | (01) Bureau of Economics and Statistics |
| (०४)मुख्यमंत्री फेलोशिप कार्यक्रम (दत्तमत) (योजनांतर्गत योजना) (३४५४०५९२ ) | ((04) Chief Minister Fellowship Scheme (Voted) (Plan Scheme) (34540592) |
| ०६ - दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | 06 - Telephone,Electricity and Water Charges |
| ११ -देशांतर्गत प्रवास खर्च | 11- Domestic Travel Expenses |
| १३ -कार्यालयीन खर्च | 13- Office Expenditure |
| १७ -संगणक खर्च | 17- Computer Expenses |
| २०- इतर प्रशासकीय खर्च | 20- Other Administrative Expenses |
| ३४ -शिष्यवृत्या व विद्यावेतने | 34- Scholarship / Stipend |

२.     सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४७/अर्थ-१६, दिनांक ०१/१०/२०१५ अन्वये तसेच महालेखापाल (लेखा व हकदारी)-१, महाराष्ट्र, मुंबई यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.:-सं.ख.वि./चा-१/नियोजन विभाग/यूओआर-८८/२०१५-१६/७१५, दिनांक ११/०९/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५११०९१६५२०९२६१६ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.11.09 16:54:55 +05'30'

(वसंत कुळकर्णी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. सर्व मा.संसद सदस्य /मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव
७. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा व हकदारी) महाराष्ट्र-१, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
१०.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३.सर्व विभागीय आयुक्त,
१४.सर्व जिल्हाधिकारी,
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१६.कार्यासन अधिकारी (कार्या.-३९/कार्या.-१२),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.कार्यासन अधिकारी (व्यय-८/अर्थसंकल्प-१६),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८.कार्यासन अधिकारी (कार्यासन क्र.१४११,१४१२,१४२४),नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.निवड नस्ती (का.१४२६)